2

20140924112555245 23

**अकलूज जिल्हा, सोलापूर येथील पुरातन किल्ल्याची दुरुस्ती, शिवसृष्टी, संभाजीसृष्टी उभारणे, सुशोभिकरण करणे या कामांसाठी प्रादेशिक पर्यटन विकास योजनेतंर्गत प्रशासकीय मान्यता देणेबाबत व निधी वितरीत करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग,
शासन निर्णय, क्रमांक टोडोएस २००८/प्र.क्र.४५६/पर्यटन,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
दिनांक :- २८.०१.२००९

**वाचा : शासन निर्णय क्र. एमटीसी २००६/प्र.क्र. ३६२/पर्यटन दि. १६.३.२००६**

**शासन निर्णय :-** प्रादेशिक पर्यटन विकास अंतर्गत अकलूज जिल्हा, सोलापूर येथील पुरातन किल्ल्याची दुरुस्ती, शिवसृष्टी, संभाजीसृष्टी उभारणे, सुशोभिकरण करण्यासाठी पुढील विकास कामांना प्रशासकीय मान्यता देऊन रु. १६५.०० लाख इतका निधी उपलब्ध करुन देण्यात येत आहे. तपशिल खालील प्रमाणे आहे.

जिल्हाधिकारी, सोलापूर यांच्या दिनांक ०४/११/२००८ च्या पत्रानुसार खालील कामांना रु. ६९.८१ लाख इतका निधी वितरीत करण्यात येत आहे.

**(रु. लाखात)**

| अ. क्र. | कामाचे नांव | अंदाजित किंमत (रुपये) |
|---|---|---|
| १. | बुरुज व तटभिंतीवर मावळे व घोडयांच्या प्रतिकृती बसविणे. | २४.८१ |
| २. | किल्ला परिसर व नगारखाना इमारतीवर मावळे व हत्तींच्या प्रतिकृती बसविणे. | २५.०० |
| ३. | किल्ला परिसरातील विद्युतीकरण करणे. | २०.०० |
| | **एकूण** | **६९.८१** |

उपरोक्त कामांची अंदाजपत्रके सादर करण्यात आली असून अंदाजित रक्कम रुपये ६९.८८ लाख इतक्या रक्कमेचा आराखडा सादर केला आहे.

तसेच जिल्हाधिकारी, सोलापूर यांच्या दिनांक २७/११/२००८ च्या पत्रानुसार खालील कामांना रुपये ९५.१९ लाख इतका निधी वितरीत करण्यात येत आहे.

(रु. लाखात)

| अ.क्र. | कामाचे नांव | अंदाजित रक्कम | यापुर्वी मंजूर रक्कम | या शासन निर्णयान्वये वितरीत करावयाची रक्कम |
|---|---|---|---|---|
| १) | **प्रकाश व ध्वनी योजना (सुधारित प्रस्ताव)** | | | |
| | १. पटकथा तयार करणे. | ५.५५ | - | - |
| | २. ध्वनीमुद्रण करणे. | ३४.१३ | - | - |
| | ३. हाय पॉवर एलईडो फिटींग व पार ६४ फिटींग बसविणे. | २७.४८ | - | - |
| | ४. हाय पॉवर एलईडो कलरचेंजर फ्रेस नेल कलर चेंजर व स्ट्रोब लाईट बसविणे. | १९.८३ | - | - |
| | ५. ध्वनी उपकरणांचा पुरवठा व उभारणी करणे. | २३.०४ | - | - |
| | ६. सेल नियंत्रण उपकरणांचा पुरवठा व उभारणी करणे. | २६.५४ | | - |
| | ७. स्पेशल इफेक्ट फिटींगचा पुरवठा व उभारणी करणे. | १९.१५ | - | - |
| | ८. प्रोग्रामिंग, टेस्टींग व केबलचा पुरवठा व उभारणी करणे. | २४.१४ | - | - |
| | **एकूण** | **१८०.६६** | **८५.४७** | **९५.१९** |

वरील सर्व कामांच्या अंदाजपत्रकास कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, अकलूज व कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम (विद्युत) विभाग, पुणे, यांची तांत्रिक मंजूरी घेण्यात आली आहे.

सन २००६-०७ मध्ये प्रादेशिक पर्यटन योजनेतंर्गत अर्थसंकल्पीत करण्यात आलेल्या रु.२९००.०० लाख एवढया तरतूदीतून महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळास रु.२१५२.९९लाख इतका निधी वितरीत केला आहे. सदर निधीपैकी रु. ११७८.४२ लाख इतका निधी महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळाकडे शिल्लक आहे. महामंडळाकडे शिल्लक असलेल्या महामंडळाने **जिल्हाधिकारी, सोलापूर यांना वरील तक्त्यात दर्शविलेल्या कामासाठी अनुक्रमे रुपये ६९.८१ लाख अधिक रुपये ९५.१९ लाख मिळून एकूण रुपये १,६५,००,०००/- (अक्षरी रुपये एकशे पासष्ठ लाख फक्त) अदा करण्यास शासन खालील अटीच्या अधिन राहून मंजूरी देत आहे.**

१) वितरीत केलेल्या निधीतून खर्च करताना वित्तीय नियमांचे आणि विविध नियमांतर्गत नेमून दिलेल्या कार्यपध्दतीचे पालन करण्यात यावे.

२) कोणत्याही परिस्थितीत मंजूर अनुदानापेक्षा जास्त खर्च होणार नाही याची दक्षता घेण्यात यावी. मंजूर अनुदानापेक्षा जादा खर्च झाल्यास त्याची जबाबदारी जिल्हाधिकारी यांच्यावर राहील व जादा खर्च प्रित्यर्थ जादा अनुदान उपलब्ध करुन दिले जाणार नाही.

३)     मंजूर तरतुदीतून करावयाचा खर्च निधी प्राप्त होताच करावा व मंजूर कामे तात्काळ पूर्ण करावीत.

४)     ज्या संदर्भात निधी उपलब्ध करुन देण्यात येत आहे त्या प्रत्येक योजनेच्या संदर्भात वित्तीय अधिकाराच्या प्रत्यावर्तनानुसार सक्षम प्रशासकीय व वित्तीय मान्यता घेणे आवश्यक आहे.

५)     अशा प्रत्येक योजनेबाबत करावयाच्या बांधकामासंदर्भात अथवा खरेदीबाबत किंवा सेबा पुरवठा कराराबाबत वित्तीय नियमांप्रमाणे आवश्यक ती कार्यपध्दती पाळणे आवश्यक आहे. या संदर्भात शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक-संकीर्ण-१००२/प्र.क्र.१५/कोषा-प्र५, दि. ६ फेब्रुवारी, २००२ च्या सूचनांचे काटेकोरपणे पालन होईल याची खबरदारी संबंधित अंमलबजावणी यंत्रणेने घ्यावी. तसेच शासन निर्णय वित्त विभाग क्र.बीजीटी-१०.००/प्र.क्र.५६/२०००/वित्तीय सुधारणा दिनांक १०.९.२००१ मधील उपाययोजनांची अंमलबजावणी तंतोतंतपणे करण्यात यावी.

६)     उपरोक्त सर्व कामांना प्रशासकीय व तांत्रिक मान्यता, यापूर्वी घेतली नसल्यास, काम सुरु करण्यापूर्वी प्राप्त करुन घेण्यात यावी. ज्या प्रस्तावांना प्रशासकीय व तांत्रिक मान्यता देताना काही अटी व शर्ती विहित करण्यात आलेल्या आहेत अशा अटी व शर्तींची आधी पूर्तता करणे बंधनकारक राहील.

७)     प्रस्तावित कामांच्या प्रकरणांमध्ये सार्वजनिक बांधकाम विभागाच्या नियमावलीचे पालन करणे बंधनकारक राहील.

८)     योजनेतर स्वरुपाच्या कामासाठी (देखभाल/दुरुस्ती इ.) सदरची तरतूद उपयोगात आणली जाणार नाही याची दक्षता घ्यावी.

९)     सदर कामांपैकी जी कामे तीर्थक्षेत्रांच्या विकासासाठी प्रस्तावित करुन देवस्थान/संस्थेच्या जागेवर करण्यात येणार आहेत अशा कामांसंदर्भात सदर देवस्थान/संस्थेकडून ना-हरकत प्रमाणपत्र प्राप्त करुन घेणे बंधनकारक राहील. तसेच अशा कामाच्या पूर्णत्वानंतर त्या संदर्भातील देखभाल/दुरुस्ती, संबंधित संस्थेने करण्यासंदर्भात मुख्य कार्यकारी अधिका-यांनी संबंधित देवस्थान संस्थेबरोबर करारनामा करणे बंधनकारक राहील. अशा प्रकारच्या देखभाल दुरुस्तीकरिता शासनाकडून यापुढे कोणत्याही प्रकारचा निधी उपलब्ध करुन दिला जाणार नाही याची नोंद घेण्यात यावी व तशी अट करारात अंतर्भूत करण्यात यावी. तसेच या कामामुळे निर्माण होणा-या सर्व सुविधा तसेच पर्यटन स्थळ सर्व नागरिकांसाठी खुले राहील अशी अट करारात समाविष्ट करण्यात यावी.

१०)     सदर निधीतून होणा-या खर्चातून करावयाच्या कामांची भौतिक प्रगती तसेच निधीतून होणा-या खर्चाची मासिक विवरणपत्रे दर महिन्याच्या १० तारखेपर्यंत शासनास न चुकता सादर

करावीत. तसेच काम पूर्ण झाल्यानंतर पूर्णत्वाचा दाखला आणि निधीबाबतचे उपयोगिता प्रमाणपत्र न चुकता शासनास सादर करण्यात यावे.

११) सदर काम पूर्ण झाल्यानंतर सदर स्मारकाच्या देखभालाची तसेच इतर अनुषंगिक कामांची जबाबदारी सार्वजनिक बांधकाम विभागाची राहील.

१२) वर नमूद करण्यात आलेला खर्च हा सन २००६-०७ या वर्षाच्या अर्थसंकल्पीय तरतूदीमधून मुख्यलेखा शीर्ष **"मागणी क्रमांक झेडडी-४, ३४५२-पर्यटन, पर्यटनासाठी पायाभूत सुविधा, १०१ पर्यटन केंद्रे (०१) पंचवार्षिक योजमांतर्गत योजना - राज्य योजनांतर्गत योजना यांना (०२) (१८) पर्यटन विकासासाठी विविध ठिकाणांसाठी मूलभूत सुविधांकरिता अनुदान (३४५२ १९५ ८) ३१ सहाय्यक अनुदाने"** या लेखा शिर्षाखाली मंजुर तरतूदीमधून भागविण्यात यावा.

१३) या प्रकरणी महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळात उपलब्ध करुन देण्यात आलेल्या रु.२१५२.९१ लाख निधीतून महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळाने जिल्हाधिकारी, सोलापूर यांना **रुपये १,६५,००,०००/- (अक्षरी रुपये एकशे पासष्ठ लाख फक्त)** देण्यात यावेत.

१४) जिल्हाधिकारी, सोलापूर यांनी यासंदर्भात होणाऱ्या खर्चाचा मेळ महालेखापालांच्या कार्यालयाशी घालून त्याबाबतचे विवरणपत्र अर्थसंकल्पीय नियम पुस्तिकेतील नियमांप्रमाणे शासनास सादर करावे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

आ।बा।डमाळे

**(आ.बा.डमाळे)**

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

प्रति,

महालेखापाल, महाराष्ट्र-१, (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता), मुंबई,
महालेखापाल, महाराष्ट्र-२, (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), नागपूर,
व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळ, मुंबई
विभागीय आयुक्त, पुणे
जिल्हाधिकारी, सोलापूर
जिल्हा कोषागार अधिकारी, सोलापूर
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
नियोजन विभाग (का.१४१२) मंत्रालय, मुंबई,
वित्त विभाग (का. व्यय-१४/अर्थोपाय)मंत्रालय, मुंबई,
कक्ष अधिकारी, सां.का.-(अर्थसं), पर्यटन व सां.का.विभाग, मंत्रालय, मुंबई,
निवड नस्ती, कार्यासन-पर्यटन.

C:\WINDOWS.ooo\Desktop\Sujay\Gr.- Akluj Fort.doc